**पश्चिम मेळघाट वनविभाग, परतवाडा येथील अकोट मुख्यालयी संरक्षण भिंत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.३२९/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- २ नोंव्हेबर, २०१८**

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/वअं/लेखा/प्रमं./प्र.क्र.१५/४८७/२०१८-१९, दिनांक ०३.०९.२०१८.

**प्रस्तावना:-**

मुख्य वनसंरक्षक (प्रा.) अमरावती यांचे अधिपत्याखालील उपवनसंरक्षक (प्रा.), पश्चिम मेळघाट वनविभाग, परतवाडा येथील अकोट मुख्यालयी संरक्षण भिंत बांधकामाचे अंदाजपत्रक वन विभागाच्या संबंधीत कनिष्ठ अभियंता, अमरावती मंडळ यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून उप वन अभियंता, अमरावती मंडळ, वनपरिक्षेत्र अधिकारी, आकोट, शाखा अभियंता, वन अभियंता कार्यालयय, सहाय्यक वन संरक्षक पश्चिम मेळघाट वनविभाग १, अकोट, नागपूर उप वन संरक्षक, पश्चिम मेळघाट विभाग परतवाडा यांनी साक्षांकित केले आहे. तसेच अंदाजपत्रकांना वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान केलेली आहे.

संदर्भाधिन पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने अंदाजपत्रकाचे छाननीअंती पश्चिम मेळघाट वनविभाग, परतवाडा येथील अकोट मुख्यालयी संरक्षण भिंत बांधकामाच्या जी.एस.टी.सह व ४ टक्के आकस्मिक खर्चासह एकुण रू.३३,६२,३००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिलेली आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पश्चिम मेळघाट वनविभाग, परतवाडा येथील अकोट मुख्यालयी संरक्षण भिंत बांधकामाच्या जी.एस.टी. सह व ४ टक्के आकस्मिक खर्चासह एकूण रू.३३,६२,३००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस व सोबत जोडलेल्या “प्रपत्र-अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे आणि सदरचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून भागवावा या अटीच्या अधिन राहून तसेच खालील अटींच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

१. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.

५. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.

६. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्या् येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०३११३५४५७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.11.03 11:50:46 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती
४. उपवनसंरक्षक (प्रा.),पश्चिम मेळघाट विभाग, परतवाडा
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

**“प्रपत्र-अ”**

**शासन निर्णय क्रमांक :-वनबां-२०१८/प्र.क्र.३२९/फ-९, दिनांक ०२ नोव्हेंबर,२०१८**

NAME OF WORK :- Construction of Compound Wall at RFO Office Akot premisses in Akot range in Paratwada Division

GENERAL ABSTRACT

| S.N. | PARTICULARS | Amount in Rs. |
|---|---|---|
| 1 | Amount Of Civil Cost (Compound Wall) | 28,65,954.00 |
| 2 | Add Royalty | 19,802.00 |
| 3 | Add Testing Charges | 12,850.00 |
| 4 | **Add** 4% For Conteingency | 1,15,944.00 |
| 5 | Add 12% GST | 3,47,833.00 |
| | **Total :-** | **33,62,383.00** |
| | **Say Rs.** | **33,62,300.00** |

******